**मौजे सरडपार व इतर ३ गावे (ता. सिंदेवाही, जि. चंद्रपूर) प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेस पुर्नसुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा- १४१५/प्र.क्र.२०३ /पापु-१३**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**तारीख: ३१ मार्च, २०२३.**

वाचा

१) मूळ प्रशासकीय मान्यता आदेश शासन निर्णय क्र. ववेका-१०९८/१०९६/सीआर४४५ (अ)/ पापु-१०, दि.०१.०६.१९९८
२) सुधारित प्रशासकीय मान्यता आदेश शासन निर्णय क्र. ग्रापापु-२००८/प्र.क्र.३४७ (१) /पापु-१३, दि.२०.१०.२००८
३) मुख्य अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागपूर यांचे पुर्नसुधारित तांत्रिक मान्यता आदेश, दि.२९.०९.२०१५
४) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, चंद्रपूर यांचे पत्र क्र.मजीप्रामना/तांशा/१३०२/२०१५, दि.२४.०७.२०१५
५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई यांचे पत्र क्र. मजीप्रा/सस/तांशा-४/८५३, दि.२७.०६.२०२२

**प्रस्तावना**

मौजे सरडपार व इतर ३ गावांची प्रादेशिक पा.पु.योजना(ता. सिंदेवाही, जि. चंद्रपूर) या योजनेच्या रु.२२४.६९ लाख इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास किमान गरजा कार्यक्रमांतर्गत शासन निर्णय दि.०१.०६.१९९८ च्या आदेशान्वये मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. या योजनेच्या रु.२५६.१५ लाख इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास शासन निर्णय, दि.२०.१०.२००८ अन्वये सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. कार्यकारी अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, गोंदिया यांनी योजनेच्या रु.३५२.९७ लाख इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास दि.२९.०९.२०१५ रोजी पुर्नसुधारित तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंतिम देयक अदा करण्याच्या अनुषंगाने पुर्नसुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्र.५ अन्वये शासनास सादर केला होता. तद्अनुषंगाने प्रस्तुत योजनेच्या पुर्नसुधारित आराखड्यास व अंदाजपत्रकास पुर्नसुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

मौजे सरडपार व इतर ३ गावांची प्रादेशिक पा.पु.योजना(ता. सिंदेवाही, जि. चंद्रपूर) या योजनेचे अंतिम देयक अदा करणे व लेखेजोखे बंद करण्यासाठी रु.३३८.५६ लाख/-(ढोबळ) (अक्षरी तीन कोटी अडतीस लाख छप्पन्न हजार ) (१७.५ टक्के ईटीपी चार्जेस वगळून) एवढ्या पुर्नसुधारित

किमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून पुर्नसुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी:-**

१) उपरोक्त नमूद पुनर्सुधारित किंमतीत योजनेची सर्व कामे पूर्ण करण्यात यावीत.

२) या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच पुर्नसुधारित तांत्रिक मान्यता देताना नमूद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३) सदर योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरून) यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्रह नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/ जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

४) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतीचे अधिकारी यांनी योजनेचे संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

५) सदर योजना पूर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज संस्थेने (संबंधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हस्तांतरीत करून घेणे व चालविणे बंधनकारक राहील. तद्नंतर योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६) १०० टक्के नळ जोडणीबाबत आवश्यक ते नियोजन ग्रामपंचायतीकडून करण्यात यावे.

७) जल जीवन मिशन अंतर्गत आतापर्यंत दिलेल्या नळ जोडणीची नोंद तपासणे व यापुढे देण्यात येणाऱ्या नळ जोडणीबाबत आयएमआयएस प्रणालीवर माहिती वेळेत नोंदविणे आवश्यक आहे.

८) सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१ टक्के पाणी पुरवठा योजना या देखभाल दुरुस्ती अभावी , वीजदेयक न भरल्यामुळे (Poor maintenance / nonpayment of electricity bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद यांची राहील.

९) हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

१०) प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुन:पुर्नसुधारित केली जाणार नाही याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांची राहील.

११) प्रस्तुत योजनेचे लेखेजोखे बंद करून सदरची योजना केंद्रशासनाच्या आयएमआयएस प्रणालीवरून तात्काळ कमी करण्यात यावी.

०२. या योजनेच्या पुर्नसुधारित किमंतीतील वाढीव खर्च रु.८२.४१ लाख (अक्षरी रुपये ब्याऐंशी लाख एकेचाळीस हजार फक्त ) हा मागणी क्र. वाय-०२, जिल्हा परिषद योजनांतर्गत अनुदाने (०२) (१५) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना जल जीवन मिशन यासाठी अनुदान (राज्य हिस्सा५०%) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) लेखाशीर्ष (२२१५ २०७१) या लेखाशिर्षाखालील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

०३. प्रस्तुत योजनेस पुनर्सुधारीत प्रशासकीय मान्यता ही नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२१३/१४४३, दि.१९.१०.१५ अन्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २७८/व्यय-०३, दि.२०.०९.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३१७१३४९४३९२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANI DEELIPRAO DEOKATE

Digitally signed by RANI DEELIPRAO DEOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b0869a90562f87b9afb32e69166c729b50fd795952e7aeb9091b613d5a868aa7, pseudonym=EBDDE6E6DC46959920B4201DA4C1EADA80A905B3, serialNumber=BBD64806F9A7A26899A43E3A95A0566B762C44B895D6316615D2932D87DEFEEE, cn=RANI DEELIPRAO DEOKATE
Date: 2023.03.31 15:38:23 +05'30'

**( राणी दि. देवकत्ते )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद
४. मा. विधानमंडळ सदस्य (सर्व)
५. महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
६. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
७. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग,
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
९. जिल्हाधिकारी, गोंदिया
१०.संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
११.मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता समिती,सिडको भवन,बेलापूर
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया
१३.कार्यकारी अभियंता ,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद,गोंदिया.
१४. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१५. मुख्य अभियंता तथा वि.का.अ.पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुबई.
१६. निवडनस्ती पापु-१३, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.